वाहन नोंदणी प्रमाणपत्र स्मार्ट कार्ड स्वरुपात देण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

## गृह (परिवहन)विभाग

## शासन निर्णय क्रमांक : एमव्हीडी-०७१३/प्र.क्र.२७४/परि-४

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १७ एप्रिल, २०१७

**वाचा :-**

१) शा.नि.सा.प्र.वि.क्र.सीओएम-१०९८/प्र.क्र.२१२/९८/३९,दि०५/१०/२००१,
२) क्र.पआका/का.११/स्मार्ट कार्ड आरसी/२०१६/जा.क्र.१९४२१,दि.१.१२.२०१६
३) उच्चाधिकार समितीच्या दि.२७.०१.२०१७ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :-**

मोटार वाहन मालकाला वाहनाच्या नोंदणीनंतर वाहन नोंदणी प्रमाणपत्र मोटार वाहन विभागाकडून दिले जाते. केंद्रीय मोटार वाहन नियम १९८९ मधील नियम ४८ नुसार तसेच महाराष्ट्र मोटार वाहन नियम १९८९ मधील नियम २८५-A नुसार स्मार्ट कार्ड स्वरुपातील वाहन नोंदणी प्रमाणपत्र देण्याची तरतूद राज्य शासनाने विहित केलेली आहे. त्यानुसार राज्यामध्ये वाहन नोंदणी प्रमाणपत्र स्मार्ट कार्ड स्वरुपात देण्यासाठी निविदा प्रक्रियेव्दारे सेवा पुरवठादार नियुक्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यामध्ये स्मार्ट कार्ड स्वरुपात वाहन नोंदणी प्रमाणपत्र देण्यासाठी निविदा प्रक्रिया करुन त्याव्दारे प्राप्त न्युनतम निविदाधारक मे. रोजमर्टा टेक्नोलॉजीस लि. या कंपनीची सेवा पुरवठादार म्हणून नियुक्ती करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. निविदा प्रक्रियेव्दारे प्राप्त झालेल्या न्युनतम दरानुसार प्रति स्मार्ट कार्ड रु.५४.७२/- (सर्व करांसह) असा दर मंजूर करण्यात येत आहे.

३. सदर सेवा पुरवठादाराची नियुक्ती करण्यासंदर्भात खालील अटीं विहित करण्यात येत आहे.

अ) वाहन नोंदणीसंदर्भात वाहन १.० प्रणाली मधून वाहन ४.० प्रणालीमध्ये संबंधित लिगसी डेटासह कोणत्याही अतिरिक्त खर्चाशिवाय रुपांतरीत करणे आवश्यक असून, तशी अट करारनाम्यात करण्यात यावी.

ब) सेवा पुरवठादाराची नियुक्ती करण्यासंदर्भात करावयाचा करारनामा (Master Service Agreement) माहिती तंत्रज्ञान विभागाकडून तपासून घेण्यात यावा.

क) सेवा पुरवठाराची नियुक्ती पुढील दोन वर्षाच्या कालावधीसाठी राहील.

४. हे आदेश संदर्भाधीन दि.०५.१०.२००१ च्या शासन निर्णयान्वये उच्चाधिकार समितीस प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार उच्चाधिकार समितीच्या दिनांक २३.०१.२०१७ च्या बैठकीमध्ये निविदा प्रक्रिया अंतिम करुन त्यानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४१७११०६०८४५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Tikamdas N. Shikharame

Digitally signed by Tikamdas N. Shikharame
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=12c50633547b609d1eafa52a6f58635e0b53088462877241f83faca5a99dd3a6, cn=Tikamdas N. Shikharame
Date: 2017.04.17 14:58:28 +05'30'

**(टि.न.शिखरामे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
४. मा.मंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा.राज्यमंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७. महालेखापाल १/२, (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
८. महालेखापाल १/२, (लेखापरीक्षा) मुंबई/नागपूर
९. सामान्य प्रशासन विभाग (माहिती व तंत्रज्ञान),मुंबई
१०.वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
११. प्रादेशिक / उपप्रादेशिक परिवहन अधिकारी (सर्व)
१२.मे. रोजमर्टा टेक्नॉलॉजीस लि.
१३. निवडनस्ती (परिवहन-४)